सेवा निवृत्त होणा-या जिल्हा परिषद कर्मचा-यांना निवृत्ती वेतन विषयक लाभ वेळेवर अदा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
शासन परिपत्रक क्रमांक पीईएन २०००/प्र.क्र.११९/१७.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २२/५/२०००.

पहा- १) शासन परिपत्रक क्र. पीईएन १०८३/८०६/सीआर (३६८)/१७ दिनांक १०.१०.८३
२)शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांक, पीईएन १०८५/६४३/सीआर १३०१/१७, दिनांक ३१ मे, १९८५.
३)शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग, क्रमांक पीईएन १०८६/सीआर २२००/१७, दिनांक ११ जून, १९८६.
४)शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांक पीईएन १०८८/सीआर १२५/१७ दिनांक २९ फेब्रुवारी १९८८.
५)शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. सेनिवे १०००/१२०/सेवा ४, दिनांक १८ एप्रिल, २०००.

शासन परिपत्रक-

जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या सेवानिवृत्ती वेतन प्रकरणी होणा-या विलंबामुळे पंचायत राज समितीने वेळोवेळी घेतलेले आक्षेप तसेच लोक आयुक्तांनी वारंवार नाराजी व्यक्त केल्यामुळे संदर्भात उल्लेख केलेल्या परिपत्रकांद्वारे शासनाने सूचना दिल्या आहेत. आता शासन वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक सेनिवे-१०००/१२०/सेवा ४, दिनांक १८ एप्रिल २००० अन्वये सर्व कार्यालयीन प्रमुख व विभाग प्रमुख यांना या संदर्भात नव्याने निदेश देण्यात आलेले आहेत. नियत वयोमानानुसार निवृत्ती वेतन ज्या महिन्यात देय आहे त्या महिन्याच्या पहिल्या तारखेपासून देणे शक्य व्हावे यासाठी कार्यालय प्रमुख व निवृत्ती वेतन व उपदान प्रस्ताव देण्यांच्या व प्राधिकृत करण्यांच्या विविध कार्यपध्दतीबाबत महाराष्ट्र नागरी सेवा ( निवृत्ती वेतन ) नियम १९८२ मधील प्रकरण .१० मध्ये विहित केलेले वेळापत्रक पाळणे आवश्यक आहे. सदर बाब जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच विभागीय आयुक्त यांच्या निदर्शनास संदर्भातील परिपत्रकाव्दारे वेळोवेळी आणण्यात आली आहे. तरीही निवृत्ती वेतन धारकांना निवृत्तीच्या दिनांकानंतर ब-याच उशीरा निवृत्ती वेतन प्राधिकृत करणे जाते व त्यांना आर्थिक त्रास सोसावा लागतो. त्यामुळे याची शासनाने गंभीर दखल घेतली आहे.

GAM-2\D-17Cr.119

GR-200201221557540000-1200

याद्वारे सर्व जिल्हा परिषदांच्या कार्यालयीन प्रमुख/विभाग प्रमुख यांना असे निदेश देण्यात येत आहेत की, त्यांनी निवृत्ती वेतन विषयक लाभांच्या प्रकरणी मनासे ( निवृत्ती वेतन ) नियम १९८२ मधील प्रकरण १० मध्ये विहित केलेले वेळापत्रक पाळले जाईल. त्याचप्रमाणे शासनाने या संदर्भात वेळोवेळी प्रसृत केलेल्या आदेशाच्या अनुषंगाने विहित कार्यपध्दतीचे पालन केले जाईल. याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांस निवृत्ती वेतन विषयक लाभ प्रदान करण्यास विलंब झाला तर संबंधित कार्यालयीन प्रमुखावर जबाबदारी निश्चित करुन त्यांच्याविरुध्द त्वरित शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी. त्याशिवाय त्यांच्या गोपनीय अहवालात "निवृत्ती वेतनाची प्रकरणे निकालात काढण्यास अक्षम्य दिरंगाई झाल्याने शासनास व्याजापोटी आर्थिक झळ बसण्यास जबाबदार आहेत." अशाप्रकारची नोंद घेण्यात यावी.

तसेच असेही निदेश देण्यात येत आहेत की, जिल्हा परिषदांकडून निवृत्ती वेतन विषयक प्रकरणांवर यथोचितरित्या व विहित वेळापत्रकानुसार कार्यवाही होत आहे. याची शहानिशा करण्यासाठी विभागीय आयुक्तांच्या कार्यालयातील उपआयुक्त ( आस्थापना ) यांनी त्रैमासिक बैठक घेऊन संबंधित कार्यालय विभाग प्रमुख यांना वेळोवेळी निदेश द्यावेत. याद्वारे असेही निदेश देण्यात येत आहेत की, सेवानिवृत्त विषयक प्रकरणांवर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी उपआयुक्त ( आस्थापना ) यांची राहील.

सेवानिवृत्त होणा-या जिल्हा परिषद कर्मचा-यांना निवृत्तीवेतन विषयक लाभ वेळेवर अदा करण्याच्या अनुषंगाने संदर्भात उल्लेख केलेल्या आदेशांच्या तसेच वित्त विभागाच्या दि.१८.४.२००० मधील सूचनांचा याद्वारे पुनरुच्चार करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(चंद्रा अय्यंगार)

सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१)सर्व विभागीय आयुक्त

२)सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

GR-20020122155754000-1200

३)सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी.

४)सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.

५)सर्व जिल्हा परिषदेमधील विभाग प्रमुख

६)सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी.

७)कार्यासन क्र.१० व ११ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

८)निवड नस्ती का.क्र.१७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

GR-20020122155754000-1201